**राज्यात माहे फेब्रुवारी व मार्च २०१५ मध्ये अवेळी पाऊस व गारपीठ मुळे नुकसान झालेल्या गावातील सहकारी कर्जाचे रुपांतरण, शेतीशी निगडीत कर्जाच्या वसुलीस स्थगीती व कर्जावरील व्याज माफ करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः गारपीठ ०४१५/प्र.क्र.१५१/२-स**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
तारीख: ७ जुलै २०१५

**पहा :-** शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. सीएलएस २०१५/प्र.क्र. ४०/ म-३ दि. १३.४.२०१५

**शासन परिपत्रक** :-

राज्यातील माहे फेब्रुवारी मार्च २०१५ मध्ये अवेळी पाऊस व गारपीठ यामुळे काही प्रमाणात जिवीत हानी व वित्त हानी झाली आहे. तसेच शेतजमीन आणि शेत पिकांचे देखिल काही प्रमाणात नुकसान झाले आहे. राज्यामध्ये फेब्रुवारी व मार्च २०१५ या कालावधीमध्ये अवेळी पाऊस व गारपीठ यामुळे झालेल्या जिवीत व वित्त हानी पोटी आपतग्रस्तांना विशेष दराने मदत करण्याबाबत मंत्री मंडळाने दि. ९.४.२०१५ रोजी घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने माहे फेब्रुवारी व मार्च २०१५ या कालावधीत पाऊस व गारपीठ यामुळे झालेल्या जिवीत व वित्त हानीमुळे बाधीत आपदग्रस्तांना विशेष बाब म्हणून मदत देण्याचा शासन निर्णय महसूल व वन विभाग दि. १३.०४.२०१५ अन्वये घेतला आहे. सदर शासन निर्णयातील सहकार विभागाशी संबंधित खालील सवलती देण्यात आलेल्या आहेत.

(१) सहकारी कर्जाचे पुर्नगठन.
(२) शेतीशी निगडीत कर्जाच्या वसुलीस स्थगीती ( एक वर्षासाठी स्थगिती)
(३) कर्जावरील व्याज माफ (३ महिन्याच्या कालावधीसाठी)

जिल्हाधिकारी यांनी ज्या गावांमध्ये फेब्रुवारी व मार्च २०१५ मध्ये अवेळी पाऊस व गारपीठ झाल्याचे जाहीर केले आहे अशा गावातील बाधित शेतक-यांना उपरोक्त सवलत लागु करण्यात यावी. शासनाच्या दि. १३.०४.२०१५ च्या शासन निर्णयानुसार जे बाधित शेतकरी अर्थसहायास पात्र आहेत असे बाधित शेतकरी वरील सवलतीस पात्र राहतील. जिल्हाधिकारी यांनी जाहिर केलेल्या गावांतील बाधीत शेतक-यांचे अल्पमुदत कर्जाचे मध्यम मुदत कर्जात रुपांतरण, शेतीशी निगडीत कर्जाच्या वसुलीस एक वर्षासाठी स्थगीती व तीन महिन्याच्या कालावधीचे व्याज माफ करुन शासनामार्फत संबंधित बँकांना आदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. याबाबत महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि. मुंबई व संबंधित जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांनी आवश्यक ती कार्यवाही करावी.

शेत जमिनीच्या झालेल्या नुकसानीकरीता शासन निर्णय महसूल व वन विभाग दि. १३.०४.२०१५ अन्वये प्राप्त होणा-या मदतीची रक्कम खातेदारांच्या बँक खात्यावर थेट जमा करताना मदतीच्या रक्कमेमधुन कोणत्याही बँकेने कोणत्याही प्रकारची वसुली करू नये.

या शासन परिपत्रकाची अंमलबजावणी कटाक्षाने करण्यात येईल याची सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दक्षता घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्र.  २०१५०७०७१७२७३०९८०२ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Arun Patil

Digitally signed by Santosh Arun Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Officer On Special Duty, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=e52439642ab57c332b2a3e3e46f0d907ba6167409ef6d52c943bf775ecf042fd, cn=Santosh Arun Patil
Date: 2015.07.08 15:30:36 +05'30'

**(संतोष पाटील)**
विशेष कार्य अधिकारी

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२) मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
३) मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
४) मा. विधान सभा सदस्य /विधान परिषद सदस्य. (सर्व)
५) प्रधान सचिव (पुनर्वसन व मदतकार्य ), महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
६) प्रधान सचिव (सहकार)सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
७) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) आयुक्त, कृषी संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) संचालक, पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) सर्व जिल्हाधिकारी.
११) सह सचिव, भारत सरकार, कृषी मंत्रालय (सहकार विभाग ) कृषी भवन, नवी दिल्ली.
१२) महाव्यवस्थापक, राष्ट्रीय कृषी व ग्रामीण विकास बँक, प्रादेशिक कार्यालय, पुणे.
१३) मुख्य अधिकारी, रिझर्व बँक ऑफ इंडीया, ॲग्रिकल्चरल क्रेडीट डिपार्टमेंट, सेंट्रल ऑफिस, गारमेंट  हाऊस, मुंबई ४०० ०१८.
१४) उप मुख्य अधिकारी, रिझर्व बँक ऑफ इंडिया, ॲग्रिकल्चरल क्रेडीट डिपार्टमेंट, बॉम्बे रिजनल ऑफिस, गारमेंट हाऊस, मुंबई ४०० ०१८.

१५) सर्व विभागीय सह निबंधक, सहकारी संस्था.

१६) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.

१७) सर्व कार्यकारी संचालक, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक.

१८) समन्वयक, राज्य स्तरीय बँकर्स समिती, १५०१, लोकमंगल, शिवाजीनगर पुणे-४११००५

१९) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक, मुंबई.

२०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय मंत्रालय, मुंबई

२१) सर्व कार्यासने, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,

२२) निवड नस्ती- २ स